महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
दालन क्र.५५७, ५ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्र ०२२-२२७९४१७२/२२७९३३४४ Email ID : adm३-gad@mah.gov.in


---

क्रमांक :- प्रतिनि २०२४/प्र.क्र.१०३/प्रशा-३ (१४-अ) दिनांक : १९ जुलै, २०२४

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय :-** **प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांतील "सहायक कक्ष अधिकारी" व "लिपिक-टंकलेखक" या संवर्गातील पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.**

**संदर्भ:-**
1) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२, दिनांक १७-१२-२०१६
2) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का. १२, दिनांक १६-०२-२०१८
3) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१-०८-२०१७.
4) सा.प्र.वि.शा.नि.क्र.प्राविचौ १४२३/प्र.क्र.५१/विचौ-२(११-अ), दिनांक १०.०७.२०२४.

**महोदय/महोदया,**

संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१६.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीच्या धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सामान्य प्रशासन विभाग/विचौ-२ यांनी त्यांच्या अधिपत्याखालील ६ प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकरीता निर्मित १२ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. ६ प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांच्या कार्यालयांकरीता प्रत्येकी १ सहायक कक्ष अधिकारी व १ लिपिक टंकलेखक अशी खालीलप्रमाणे एकूण १२ पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रतिनियुक्तीने भरावयाच्या पदाचे नाव | कार्यालयाचे नाव | मंत्रालयीन संवर्ग | प्रतिनियुक्तीने भरावयाचे पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | | ३ | ५ |
| १. | सहायक कक्ष अधिकारी | प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालय कोकण, पुणे, नाशिक, छ.संभाजीनगर, अमरावती, नागपूर (प्रत्येकी १) | सहायक कक्ष अधिकारी | ६ | (एस १४ : ३८६००-१२२८००) |
| २. | लिपिक-टंकलेखक | प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालय कोकण, पुणे, नाशिक, छ.संभाजीनगर, अमरावती, नागपूर (प्रत्येकी १) | लिपिक-टंकलेखक | ६ | (एस ६ : १९९००-६३२००) |

३. उपरोक्त विवरणपत्रातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबतची कार्यवाही विचौ-२ कार्यासनाच्या सहमतीने प्रचलित कार्यपध्दतीनुसार या कार्यासनामार्फत करण्यात येईल.

४. उपरोक्त विवरणपत्रातील रिक्त पदे मंत्रालयीन संवर्गातील कर्मचाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता सदर जाहिरात प्रसिध्द करण्यात येत असल्याने या जाहिरातीस अनुसरुन क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांनी सदर पदांकरीता या विभागाकडे अर्ज सादर करु नयेत व असे अर्ज सादर करण्यात आल्यास ते विचारात घेतले जाणार नाहीत, तसेच त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही.

५. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता मंत्रालयीन विभागातील इच्छुक सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही. संबंधीत प्रशासकीय विभागांनी सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ (अ)(८) मध्ये नमूद केल्यानुसार नियमित नियुक्तीपासून किमान ७ वर्षे सेवा कालावधी पूर्ण करत नाहीत, अशा कर्मचाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करू नये.

६. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन खालील माहितीसह आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे **दिनांक ०८.०८.२०२४** पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | सध्या घेत असलेली वेतनश्रेणी | |
| ३) | जन्मदिनांक | |
| ४) | प्रथम नियुक्तीचा दिनांक | |
| ५) | सध्याच्या पदावरील नियुक्तीचा दिनांक | |
| ६) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ७) | शैक्षणिक अर्हता | |
| ८) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ९) | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| १०) | मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केले आहे का? (दि.३१.३.२०२४ रोजीचे) | |
| ११) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| १२) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी)<br>दि.----------पासून दि.----------पर्यंत / पद / प्रतिनियुक्तीचे ठिकाण(कार्यालय) | प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी -------वर्षे |
| १३) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १४) | मागील प्रतिनियुक्तीवरुन परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का ? | |
| १५) | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे ? | |

७. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्यांना त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक इच्छुक नसल्यास तसेही कृपया **दिनांक** ०८.०८.२०२४ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.

८. सद्य:स्थितीत मंत्रालयीन सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक संवर्गात मोठ्या प्रमाणात पदे रिक्त आहे. यास्तव प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी नियुक्ती करण्यास विभागाने सहमती दिल्यास त्या सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक यांच्या बदल्यात/जागी संबंधित विभागास तातडीने सहायक कक्ष अधिकारी/लिपिक-टंकलेखक उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही याची विभागांनी नोंद घ्यावी.

९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदरचे पत्र त्यांच्या विभागातील सहायक कक्ष अधिकारी व लिपिक-टंकलेखक या संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०७१९१२२५११२८०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.07.19 12:39:01 +05'30'

**(ग. स. परब)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) सह सचिव (विचौ-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२) सा.प्र.वि./प्रशा-३ (१४-अ) (संग्रहार्थ).